मिझेल्स व रुबेला लसीकरण मोहिमेच्या आखणीसाठी व त्याची नियोजनबध्द अंमलबजावणी करण्यासाठी राज्य कार्यकारी गट (State Operation Group) स्थापन करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः लसिका-२०१८/प्र.क्र.३८५/कु.क.**

१० वा मजला, बी विंग, गो.ते.रुग्णालय संकुल इमारत
नवीन मंत्रालय, लो.टि.मार्ग, मुंबई ४०० ००१
तारीख: २१ ऑगस्ट,२०१८

**प्रस्तावना -**

जागतिक आरोग्य संघटनेच्या निष्कर्षानुसार भारतात मिझेल्स अर्थात गोवरमुळे बालमृत्यूदरात वाढ होते. तसेच रुबेला संसर्गाने जन्मजात आजार होतात. बालमृत्यू दराचे वाढलेले प्रमाण कमी करण्यासाठी व रुबेला संसर्गाने जन्मजात विकलांगता नियंत्रीत करण्यासाठी केंद्र शासनाने राज्यात मिझेल्स रुबेला लसीकरण मोहिम राबविण्याच्या सूचना दिल्या आहेत. केंद्रीय मार्गदर्शक तत्वानुसार मोहिमेची नियोजनबध्द आखणी करुन अंमलबजावणी करण्यासाठी प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांच्या अध्यक्षतेखाली राज्य कार्यकारी गट (State Operation Group) स्थापना करण्याची बाब शासनस्तरावर विचाराधीन होती. याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-**

१. मिझेल्स अर्थात गोवर व रुबेला आणि रूबेला मुळे उद्भवण्याऱ्या जन्मजात आजारांचे देशातून सन २०२० पर्यंत समूळ निर्मूलन करण्यासाठी इतर राज्याप्रमाणे महाराष्ट्रात देखील वय वर्षे ९ महिने ते वय वर्षे १५ या वयोगटातील मुलांना मिझेल्स-रुबेला लस देण्यासाठी लसीकरण मोहिम यशस्वीरीत्या राबविण्यासाठी राज्य कार्यकारी गटाची स्थापन करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

२. केंद्र शासनाच्या मिझेल्स रुबेला मोहिम राबविण्याच्या कार्यपध्दतीबाबत महाराष्ट्र राज्यात मा.प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांच्या अध्यक्षतेखाली **राज्य कार्यकारी गटाची (State Operation Group)** स्थापना करण्यात येत आहे. या समितीमध्ये पुढीलप्रमाणे सदस्य असतील:-

| | |
|---|---|
| अध्यक्ष | मा.प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग |
| सदस्य | अ.मु.स. / प्र.स./ सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, महिला व बालविकास विभाग, शालेय शिक्षण विभाग, गृह विभाग, नगर विकास विभाग, ग्राम विकास विभाग, अल्प संख्याक विभाग, आदिवासी विकास विभाग, सामाजिक न्याय विभाग, संचालक माहिती व जनसंपर्क व आवश्यक ते विभाग |
| सहयोगी विकास सदस्य | भारतातील जागतिक संघटनेचे प्रतिनिधी, युनिसेफचे प्रतिनिधी |
| सदस्य सचिव | अतिरिक्त संचालक कु.क. |

३. **समितीची कार्यकक्षा :-**

अ) मोहिमेच्या अंमलबजावणीसाठी आराखडा तयार करणे, त्यावर नियंत्रण ठेवणे व त्याचे मुल्यांकन करणे व यासाठी संबंधीतांकडून आवश्यक ते तांत्रिक सहकार्य प्राप्त करुन घेणे.

ब) मिझेल्स रुबेला लसिकरण करण्यासाठी आवश्यकती कार्यवाही करणे.

क) शासन व इतर भागीदारांमध्ये आपआपसात समन्वय साधून उपलब्ध साधन संपतीचा या मोहिमेसाठी पुरेपूर वापर करणे.

ड) मोहिमेत अंतर्भुत असलेल्या कार्यांना शासनाची मान्यता घेणे.

इ) साध्या व सोप्या शब्दात मोहिमेचा संदेश जनसामान्यांपर्यंत पोहचविण्यासाठी माहिती व जनसंपर्क विभागाच्या सहकार्याने विविध प्रचार व प्रसार माध्यमांचा पुरेपूर वापर करण्यासाठी नियोजनबध्द कार्यवाही करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२११२५७५१४२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Varsha Munjaji Bharose

Digitally signed by Varsha Munjaji Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f3096a175796cc670522c4aff97da20b7089 81b5122e87c8346c4cc7468f821, serialNumber=1bd844032884bbf2167bc99cd853252 23aceef69d02bd455b7ca6972491623e0, cn=Varsha Munjaji Bharose
Date: 2018.08.21 16:06:00 +05'30'

**(व. मुं. भरोसे)**
**उप सचिव महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा.मंत्री (सर्व विभाग), मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री (सर्व विभाग), मंत्रालय, मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मा.मुख्य सचिवांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
६. अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग), मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
८. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
९. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
१०.अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, पुणे
११.आरोग्यतज्ञ, युनिसेफ, बी विंग, आर-२, टेक्नोपोलीस इमारत, तळमजला, महाकाली केव्ह रोड, एमआयडीसी जवळ, होलीफॅमिलीच्या समोर अंधेरी (पू), मुंबई-४०० ०९३
१२.जागतिक आरोग्य केंद्र, पहिला मजला, लेप्रसी बिल्डींग, कुटुंब कल्याण कार्यालय, मोती बहाद्दूर मिल रोड, नायडू हॉस्पीटल कॅम्पस, पुणे.
१३.निवडनस्ती (कु.क.)